लघुवाद न्यायालय, मुंबई यांच्या भास्कर बिल्डींग मधील तिस-या ते आठव्या मजल्यावरील कामासाठी निधी वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण- ०९१४/प्र.क्र.१७८/का-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि. ५ सप्टेंबर, २०१८.

वाचा:- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.११.६.२०१८.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक २०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि.२७.७.२०१८.

**प्रस्तावना:-**

मा.उच्च न्यायालयाच्या प्रस्तावानुसार लघुवाद न्यायालय, मुंबई यांच्या भास्कर बिल्डींग मधील तिस-या ते आठव्या मजल्यावरील कामासाठी रु. १,५८,२६,५३४/- इतक्या रक्कमेस शासन निर्णय दि. ११.६.२०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.सदर शासन निर्णयामध्ये निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे नमूद केले होते. याअनुषंगाने जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर करण्यात आला होता. त्यानुसार लघुवाद न्यायालय, मुंबई यांच्या भास्कर बिल्डींग मधील तिस-या ते आठव्या मजल्यावरील कामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

लघुवाद न्यायालय, मुंबई यांच्या भास्कर बिल्डींग मधील तिस-या ते आठव्या मजल्यावरील कामासाठी रु. ५०,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लाख फक्त) इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी विधानमंडळाने मंजूर केलेली आहे.

२. सदर पुरवणी मागणी, मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, (००) १०६- लघुवाद न्यायालये, (००)(०१) इलाखा शहर न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२१६) २७ - लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला रु. ५०,००,०००/- इतका निधी नियंत्रक अधिकारी मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई ( जे- ००३८) यांना सदर निधी वर्षाअखेर खर्ची पडेल याची दक्षता घेण्याच्या, अन्यथा जबाबदार अधिका-यावर जबाबदारी निश्चित करुन कार्यवाही करण्याच्या, तसेच सदर प्रकरणी आवश्यक असणारा उर्वरित निधी पुढील त्या त्या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करुन

घेण्याच्या व पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी बॅक खात्यात (deposit works a/c) ठेवला जाणार नाही या अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर कामे एकाच इमारतीत असल्याने सर्व कामांची एकत्रित निविदा मागविण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६६८/२०१८/व्यय- ५ दि.७.८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०५१६२७१२८५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.09.05 16:31:55 +05'30'

**(सं.सं.नवगिरे)**

कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) मा.प्रबंधक (निरिक्षणे- १), उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

२) मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई.

३) महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.

४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखा अधिकारी,मुंबई.

६) वित्त विभाग, कार्यासन-व्यय ५, मंत्रालय, मुंबई.

७) विधी व न्याय विभाग कार्या- २३ व २४ मंत्रालय, मुंबई.

८) निवडनस्ती.